मा. बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजनेंतर्गत गडचिरोली जिल्ह्यातील ०२ ग्रामपंचायतींच्या इमारत बांधकामास मंजुरी प्रदान करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक:** ग्रापंई-२०२३/प्र.क्र.१७७/बांधकाम-४

५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मुंबई-४०० ००१.

**तारीख :** २१ जून, २०२४

वाचा :-

१) **शा. नि. ग्रा. वि. वि. क्रमांकः** ग्रापंई-२०१७/प्र.क्र.२४६/बांधकाम-४, दि.२३ जानेवारी, २०१८

२) **शा.नि.ग्रा.वि.वि. क्रमांकः** ग्रापंई-२०१८/प्र.क्र.५३/ बांधकाम-४, दि.२ नोव्हेंबर, २०१८

३) **शा. नि. ग्रा. वि. वि. क्रमांकः** ग्रापंई-२०२३/प्र.क्र.१७७/बांधकाम-४, दि.०१ डिसेंबर, २०२३

प्रस्तावना :-

राज्यातील ज्या ग्रामपंचायतींना स्वतःच्या कार्यालयासाठी स्वतंत्र इमारत नाही अशा ग्रामपंचायतींना स्वतंत्र कार्यालयाची इमारत बांधण्यासाठी "मा. बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजना" संदर्भीत शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. ग्रामीण भागासाठी पायाभूत सुविधांची असणारी आवश्यकता व त्यासाठी उपलब्ध असणाऱ्या स्त्रोतांची मर्यादा विचारात घेऊन वाचा मधील अनु. क्र. ०३ येथील शासन निर्णयान्वये मा. बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजनेस मुदतवाढ देण्यात आली. तसेच निधी निकषात बदल करुन स्वतःच्या कार्यालयासाठी स्वतंत्र इमारत नसलेल्या अशा गडचिरोली जिल्ह्यातील ०२ ग्रामपंचायतींना स्वतःचे कार्यालय बांधण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>**:-

मा. बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजनेतंर्गत ज्या ग्रामपंचायतींना स्वत:च्या कार्यालयासाठी स्वतंत्र इमारत नाही अशा गडचिरोली जिल्ह्यातील ०२ ग्रामपंचायतींना स्वत:चे ग्रामपंचायत कार्यालय बांधण्यास दि.०१ डिसेंबर, २०२३ मधील तसेच पुढील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत असून सदर ग्रामपंचायतींची यादी सोबत प्रपत्र - अ मध्ये देण्यात आली आहे.

१. प्रस्तुत इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुवीजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:र्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.
२. प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एक वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करून, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पं.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

२. सोबतच्या प्रपत्र - अ मधील ग्रामपंचायतींनी स्वत:च्या कार्यालयाचे बांधकाम करावयाचे असल्यास प्रथम ग्रामसभेचा ठराव करुन लोकसंख्येच्या टप्प्याप्रमाणे शासनाने निश्चित केलेल्या बांधकाम मुल्यांनुसार ग्रामपंचायतींनी याबाबतचा ठराव संमत केल्यानंतर संबंधित ग्रामपंचायतीनी स्वत:चे कार्यालय उपलब्ध नसल्याची तसेच कार्यालय बांधण्यासाठी जागा उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतर जिल्हा परिषदेने अंतिम मंजूरी प्रदान करावी.

३. ग्रामपंचायतींनी त्यांच्या कार्यालयाचे बांधकाम शासन निर्णय क्र.ग्रापंई-२०१३/प्र.क्र.१८९/ पंरा-७, दि.३०.०१.२०१४ अन्वये तयार केलेल्या प्रचलित आराखड्यानुसार करणे आवश्यक राहील.

४. ग्राम विकास विभागाच्या दिनांक ०१ डिसेंबर, २०१५ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार, या योजने अंतर्गत अंतिमत: निवड करण्यात आलेल्या ग्रामपंचायतींना त्यांच्या कार्यालयांच्या बांधकामांना निधी वितरीत करण्याची कार्यपद्धती निश्चित करण्यात आलेली असून बांधकामाच्या टक्केवारीनुसार निधी वितरणाची कार्यवाही करण्यात येईल.

५. सदर कामांकरिता होणारा खर्च हा मागणी क्र.एल-३, “२५१५ इतर ग्राम विकास कार्यक्रम, १९८, ग्रामपंचायतींना सहाय्य (००) (००) (१०) मा.बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजना (२५१५ २५५७) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०६२११२३६४२८८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.06.21 15:21:20 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, विधानभवन, मुंबई.
२. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहायक
४. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
५. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
६. जिल्हाधिकारी, गडचिरोली.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
९. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली.
१०.सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, ग्राम विकास विभाग.
११. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली.
१२.उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.), जिल्ह परिषद, गडचिरोली.
१३. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, गडचिरोली.
१४.निवड नस्ती, कार्यासन बांधकाम-४, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.

## प्रपत्र - अ

| अनु. क्र. | जिल्ह्याचे नाव | तालुक्याचे नाव | ग्रामपंचायतीचे नाव | दिनांक ०१ डिसेंबर, २०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार अनुज्ञेय निधी (रु. लाखांत) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | गडचिरोली | गडचिरोली | दर्शनीमाल | २०.०० |
| २ | | धानोरा | दुर्गापूर | २०.०० |
| | | | एकुण | ४०.०० |